शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचारी
यांच्या सेवाशर्ती व अन्य सर्वसाधारण बाबीसंदर्भात.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रिडा विभाग
शासन निर्णय क्र.-संकिर्ण-२०१६/प्र.क्र.५८/टीएनटी-१
मंत्रालय विस्तार भवन,मुंबई-४०००३२
दिनांक :- १७ मे, २०१७

वाचा:- १) शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक:-पीबीएन/१४६४/३/६४/दहा.दि. ८ मे १९६४,

२) शासन निर्णय क्रमांक-घभाभ १००९/(३८४/०९)/माशि-२,दि.१२ नोव्हेंबर २००९,

३) शासन परिपत्रक.क्र.संकिर्ण-१९१०/(३४९/१०)/प्रशि-३.दि.९ ऑगस्ट २०१०

४) शासन निर्णय क्रमांक पीआरई २०१०/प्र.क्र.११४/प्राशि-१ दि.२९ एप्रिल २०११

५) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रिडा विभाग,क्र:-एसएसएन-२०१२/(८२/१२)/माशि-२, दि.१९ जुलै २०१२.

६) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण २४१२/(८१-अ/१२) अर्थसंकल्प.दि.७ नोव्हेंबर २०१२.

७) शासन निर्णय क्रमांक-सवेआ १००८/(५२१/०८)/माशि-२,दि.२८ मार्च २०१३

८) शासन निर्णय क्रमांक:-आरटीई २०१३/प्र.क्र.८/१३ प्रा.शि.१,दि.२८ मार्च २०१३.

९) शासन निर्णय,क्र:-पीटीआर १११३/(०१/२०१३)एसएम-४, १३ डिसेंबर २०१३.

१०) शासन निर्णय क्र:-माशातु-२०१३/(१०७/१३) माशि-१.दि.२० नोव्हेंबर २०१३.

११) शासन निर्णय क्रमांक:- न्यायप्र-२०१५/(८९/१५)/२०१५)/एसएम-४. दि. ४ ऑगस्ट २०१५.

१२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, क्र :- एसएसएन २०१५/ प्र.क्र.१६/१५/टाएनटी-२, दि. २८ ऑगस्ट २०१५.

१३) शासन परिपत्रक क्रमांक:- वेतन १२१५/प्र.क्र ३६१/१५/टीएनटी-३, दि.१४ जानेवारी २०१६.

१४) शासन निर्णय क्रमांक:-एसएसएन-२०१५/प्र.क्र.१६/१५/टीएनटी-२, दि.८ जानेवारी २०१६.

१५) आयुक्त शिक्षण कार्यालय आदेश क्रमांक:- ई.गव्हर्नर.सेल/शालार्थ/२०१६/५०, दि. ६ ऑक्टोबर,२०१६.

प्रस्तावना :-

केंद्र शासनाचा बालकांचा मोफत व सक्तीचा शिक्षणाचा अधिकार अधिनियम २००९ हा प्राथमिक,उच्चप्राथमिक शाळांकरिता लागू करण्यात आलेला आहे.तथापी सदर शिक्षण हक्क कायद्यान्वये विशेष शिक्षणाऐवढेच समाजीकरणाला महत्त्व देण्यात आले आहे. समाजातील दुर्बल घटकातील विद्यार्थ्यांच्या सोयीकरिता एक सामाजिक गरज म्हणून रात्रशाळा सुरू करण्यात आल्या

आहेत.राज्यात सध्या १७६ रात्रशाळा असून या शाळांमध्ये विविध समस्या सोडविण्यासंदर्भात दिनांक ५.५.२०१६ तसेच दि.१.८.२०१६ रोजी विविध संघटनाबरोबर रात्रशाळांचे विविध प्रश्न सोडविण्यासाठी चर्चा करण्यात आली.रात्रशाळांचे समस्यांबाबत सन १९८० मध्ये नियुक्त केलेली संशोधन समिती, दि. ६.७.२००५ रोजी प्रधान सचिव शालेय शिक्षण विभाग यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेली समिती तसेच आर्थिक भाराच्या अनुषंगाने शिक्षण संचालक, माध्यमिक व उच्च माध्यमिक यांचे अभिप्राय लक्षात घेऊन रात्रशाळांच्या संदर्भातील ज्या बाबी मान्य करण्याजोगे आहेत,त्या स्विकारून समाजातील आर्थिक व दुर्बल घटकांना रात्रशाळांच्या माध्यमातून शैक्षणिक प्रवाहामध्ये आणून त्यांचा सर्वांगिण विकास करण्याच्या दृष्टीकोनातून रात्रशाळेचे धोरण निश्चित करणे आवश्यक आहे.

महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी ( सेवेच्या शर्ती ) नियमावली, १९८१ मधील नियम २२ (२) (ग) नुसार दिवस शाळेतील काम करणाऱ्या शिक्षकांना त्यांच्या खाजगी व्यवस्थापनाच्या पूर्व परवानगीने रात्रशाळेत काम करण्याची सवलत दिलेली आहे तसेच, इच्छूक शिक्षकेत्तर पूर्णकालिक कर्मचाऱ्यांना सुद्धा रात्रीच्या शाळेच्या कामकाजासाठी पूर्णवेळ काम करण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. तसेच नियम २३ (१) (ब) नुसार दिवस पूर्णकालिन शिक्षकांस रात्रशाळेस पूर्णवेळ कालावधीसाठी काम करण्याची तरतूद करण्यात आली आहे.असे असले तरी, निव्वळ रात्रशाळेत शिकवणारे शिक्षक जे सर्वसाधारणपणे अर्धवेळ आहेत, असे शिक्षक संचमान्यतेमध्ये अतिरिक्त ठरल्यास त्यांना सेवेचे संरक्षण नसल्याने त्यांना कमी करावे लागते. माध्यमिक शाळासंहिता सेवेच्या शर्ती नियमावली ६७.१ (अ)(४) नुसार रात्रशाळेतील कर्मचाऱ्यांची सेवा नियमबद्ध करण्याची बाब उद्धधृत करण्यात आली आहे. त्यानुसार फक्त रात्रशाळेतील एकाच ठिकाणी पूर्णवेळ काम करणाऱ्या शिक्षकांना व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना सेवा संरक्षण देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय २० नोंव्हेंबर, २०१३ नुसार रात्रमाध्यमिक शाळांकरिता सेवेच्या शर्ती/ अतिरिक्त कर्मचारी/ज्यादा तुकड्या मंजूर करणे/तुकड्या सुरू करण्याकरिता स्वतंत्र आदेश निर्गमित करण्याची बाब उपस्थित करण्यात आलेले आहे. सद्यस्थितीत शिक्षण हक्क कायद्यामुळे तुकडीवर आधारित वर्गव्यवस्थेमध्ये बदल करून विद्यार्थीसंख्येवर आधारित शैक्षणिक बदल करण्यात आलेले आहेत व त्यानुसार शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांची संचमान्यता करण्यात येत आहे.त्या अनुषंगाने रात्रशाळेतील विद्यार्थी केंद्रभूत मानून रात्रशाळेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचार्यांच्या संदर्भात शैक्षणिक सेवा व सुविधा, रात्रशाळेची संचमान्यता, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या सेवा शर्ती, वेतनलाभ, निवृत्तीवेतन लाभ, इत्यादी बाबींच्या अनुषंगाने शासन खालील निर्णय घेत आहे :-

**शासन निर्णय :-**

राज्यातील शासनसहित खाजगी प्राथमिक, माध्यमिक शाळांमधील संच मान्यतेचे निकष शासन निर्णय दिनांक २८ ऑगस्ट २०१५ नुसार विहित करण्यात आलेले आहेत.दिवस शाळेच्या तुलनेत रात्रशाळेचा कार्यभार हा महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती)नियमावली १९८१ मधील तरतूदीनुसार अर्धवेळ ठेवण्यात आला असल्याने रात्रशाळेतील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्याबाबतीत संशोधन समिती, प्रधान सचिव यांच्या अध्यक्षतेखालील समितीने सुचविलेल्या शिफारशी तसेच याबाबत वेळोवेळी घेण्यात आलेल्या बैठकीतील निर्णय या सर्व बाबी विचारात घेऊन

रात्रशाळेतील विद्यार्थ्यांना उपलब्ध करून द्यावयाच्या सेवा सुविधा तसेच शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांच्या सेवा शर्ती,संचमान्यता इत्यादी बाबीसंदर्भात शासन याद्वारे खालील निर्णय घेत आहे.

१. **संचमान्यता :-**

**रात्रशाळांची संच मान्यता खालीलप्रमाणे करण्यात यावी :-**

१. दिनांक २८ ऑगस्ट, २०१५ च्या शासन निर्णयानुसार विहित केल्याप्रमाणे विद्यार्थी संख्येवर संचमान्यता तसेच शिक्षक संख्या निश्चित करण्यात यावी.

२. मात्र वरील प्रमाणे अनुज्ञेय होणारी शिक्षक संख्या अर्धवेळ शिक्षकांची राहील.

**२. विद्यार्थी प्रवेश व सोयी सुविधा :-**

१) रात्रशाळेत प्रवेश घेण्यासाठी किमान वय वर्षे ११ राहील. कमाल वयोमर्यादेची अट लागू राहणार नाही.

२) रात्रशाळेतील विद्यार्थ्यांना प्रयोगशाळा उपलब्ध करण्याकरीता त्याच संस्थेतील किंवा परिसरातील अन्य दिवस शाळेची प्रयोगशाळा वापरता येईल. मात्र अन्य संस्थेची प्रयोगशाळा वापरण्यासाठी संबंधित शिक्षण निरिक्षक / शिक्षण अधिकारी यांच्या पूर्वपरवानगीने वापरता येईल. प्रयोगशाळेवर होणारा खर्च हा रात्रशाळेच्या मंजूर अनूदानातून भागवावा.

**३. शिक्षकांचा कार्यभार व जबाबदारी :-**

१) रात्रशाळेचा दैनिक कार्यकाळ साडेतीन तासाचा राहील.

२) वर्षभरातील दिर्घकालीन सुट्ट्यांचा कालावधी कमी करुन मिळणाऱ्या कालावधीत अध्यापनाच्या अद्यावत तंत्राचा अवलंब करुन नियोजित अभ्यासक्रम पूर्ण करण्यात यावा.

३) रात्रशाळेतील माध्यमिक, उच्च माध्यमिक शिक्षकांना तासिकेच्या कार्यभारानुसार किमान आठवड्याला घड्याळी ९.०० तासाच्या पुढे कार्यभार असल्यास, नियमित पूर्णकालिक शिक्षकास अनुज्ञेय असलेला वेतनश्रेणीच्या प्रमाणात वेतनाचे लाभ महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ नियम २१ टीप क्रमांक (४) नुसार अनुज्ञेय राहील. त्यानुसार आठवड्याला तीन घड्याळी तासांपेक्षा जादा काम करीत असलेल्या व पूर्णत: अंशकालिन शिक्षकांना त्यांनी पूर्णकालिक शिक्षक म्हणून काम केले असते तर, त्यांच्या अर्हतेच्या आधारे जी वेतनश्रेणी त्यांना मिळाली असती, त्या प्रमाणातील वेतन पूर्णत: अंशकालिक शिक्षकांना अनुज्ञेय राहील.

४) महाराष्ट्र खाजगी शाळांतील कर्मचारी ( सेवेच्या शर्ती ) नियमावली, १९८१ नुसार दिवस शाळा व रात्र शाळा यांच्यातील शाळेची वेळ व कार्यभार सोडून शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांच्या सेवेच्या शर्ती, कर्तव्य, जबाबदारी सारखीच निश्चित करण्यात आलेली आहे. त्यानुसार रात्रशाळा ही अर्धवेळ मानण्यात येवून तेथील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना सदर नियमावलीतील तरतूदी लागू राहतील.

५) शाळेतील विद्यार्थ्यांचे गळतीचे प्रमाण शून्यावर आणण्यासाठी व शाळाबाह्य विद्यार्थ्यांना शिक्षणाच्या प्रवाहात आणण्यासाठी सभोवतालच्या परिसरातील एकही मूल शिक्षणापासून वंचित राहणार नाही याची सर्वस्वी जबाबदारी पूर्णवेळ शिक्षकांप्रमाणे वेतनश्रेणी घेणाऱ्या रात्रशाळेतील शिक्षकाची व शाळेची राहिल.

६) रात्रशाळेतील शिक्षक-शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना माध्यमिक शाळा संहिता ६७.१ (चार) व दिनांक १२ जून, २००९ व दिनांक ४ नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये कार्यभारानुसार सुधारित वेतन संरचना लागू राहील.

**४. सर्वसाधारण बाबी :-**

१) रात्रशाळेतील सद्यस्थितीत दुबार नोकरी करणारे शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी संख्या अनुक्रमे १०१० व ३४८ मिळून १३५८ इतकी आहे. त्यांच्या वेतनावर सरासरी वार्षिक खर्च ३४ कोटी ५० लाख रुपये इतका होतो. त्यामुळे दुबार सेवेत असलेल्याशिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना रात्रशाळेच्या सेवेतून कमी केल्यास त्यांच्यावर होणारा उपरोक्त खर्च वाचू शकतो. याबाबत खालील मुद्दे मुख्यत्वेकरून विचारात घेण्यात आले :-

अ) दुबार सेवेत काम करणाऱ्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांमुळे शासनावर मोठ्या प्रमाणात आर्थिक भार पडतो.

आ) दिवस शाळेत अतिरिक्त ठरलेल्या शिक्षकांच्या वेतनावरही शासनाचा खर्च होतो. अशा शिक्षकांना काम उपलब्ध नसले तरीही, वेतन देणे भाग असते. त्यामुळे असे शिक्षक त्यांचे नियमित शाळेत समायोजन होईपर्यंत, त्यांना रात्रशाळेतील रिक्त पदावर तात्पूरत्या स्वरुपात काम उपलब्ध करून देता येईल. व दुबार सेवेतील कर्मचाऱ्यांमुळे शासनावर पडणारा आर्थिक भार कमी होईल.

इ) रात्रशाळेत या एकाच ठिकाणी काम करणाऱ्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांची सेवाशाश्वती निश्चित करणे आवश्यक आहे.

ई) महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) विनियमन अधिनियम, १९७७ मधील कलम ४ (५) नुसार दिवसा पूर्णवेळ खाजगी अनुदानित/विना अनुदानित शाळेत काम करणाऱ्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यास दुबार नोकरी करता येणार नाही.

**वरील सर्व बाबी विचारात घेवून यापूढे दुबार सेवेत असलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना खाजगी अनुदानित/विना अनुदानित शाळेत दुबार नोकरी करता येणार नाही.**

२) खाजगी अनुदानित रात्रशाळेतील मुख्याध्यापक, लिपिक व शिपाई ही पदे कार्यभारानुसार पूर्णवेळ राहतील व मुख्याध्यापक हे पद त्याच शाळेतील सेवाज्येष्ठतेनुसार निश्चित केले जाईल.

३) रात्रशाळेला बायोमॅट्रिक हजेरी प्रणाली लागू राहील.

४) रात्रशाळेतील कर्मचाऱ्यास दिवस शाळेतील कर्मचाऱ्याप्रमाणे वैद्यकिय खर्चाची प्रतिपूर्ती मंजूरी अनूज्ञेय राहील.

५) कार्यभारानुसार नियमित पूर्णवेळ रात्र शाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शासनाच्या प्रचलित धोरणानुसार अनुकंपा तत्वाने भरती लागू राहील. अर्धवेळ शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना सदर बाब लागू असणार नाही.

६) नियमित शाळेत अतिरिक्त झालेले शिक्षक यांचे समायोजन नियमित शाळेत होईपर्यंत, रात्रशाळेतील रिक्त पदांवर तात्पूरत्या स्वरुपात करण्यात येईल. रात्रशाळा बंद पडल्यास एकाच ठिकाणी काम करणारे शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांचे समायोजन अन्य रात्रशाळेत केले जाईल. रात्रशाळेतील कर्मचारी अतिरिक्त झाल्यास तसेच त्यांचे अन्यत्र समायोजन होईपर्यंत त्यांचे वेतन त्याच शाळेतून ऑनलाईन पध्दतीनेच काढण्यात येईल.

७) शालार्थ वेतन प्रणाली रात्रशाळेतील शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांस लागू राहील.

८) रात्रशाळेत शिक्षक व शिक्षकेतर कर्मचारी यांची नियुक्ती करताना बिंदुनामावली निश्चितीनुसार पद भरती करण्यात यावी.

९) रात्रशाळेतील ज्या विषयाचा कार्यभार पूरेसा नसल्यास, अशा विषयांकरीता मानधन / तासिका तत्वावर अथवा कंत्राटी पध्दतीने शिक्षकांची नियुक्ती करण्यात यावी.

महाराष्ट्र खाजगी शाळेतील कर्मचारी (सेवेच्या शर्ती) नियमावली, १९८१ मध्ये स्वतंत्रपणे करण्यात येणाऱ्या सुधारणेच्या अटीच्या अधिन राहून हा शासन आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५१७१७४५३९९०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Dattatray Mane

Digitally signed by Sanjay Dattatray Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5938dfcf55dfa4d20c3c2b25ee54999d774aedb59d71b14cfc2860776279ef16, serialNumber=cc816238ed3c914e2fa2e99da4bc0ba4e1f6947aa23ad145e3dc6a469041090f, cn=Sanjay Dattatray Mane
Date: 2017.05.17 17:53:06 +05'30'

**( संजय द. माने )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

२) मा. मंत्री ( शालेय शिक्षण )

३) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक,

४) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग,

५) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,

६) सर्व विभागीय आयुक्त,

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.

८) सर्व जिल्हाधिकारी,

९) सर्व आयुक्त, महानगर पालिका,

१०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

११) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.

१२) शिक्षण संचालक, ( प्राथमिक) महाराष्ट्र राज्य पुणे.

१३) शिक्षण संचालक, ( माध्यमिक व उच्च माध्यमिक ) महाराष्ट्र राज्य पुणे.

१४) शिक्षण संचालक, ( प्रौढ शिक्षण ) महाराष्ट्र राज्य पुणे.

१५) संचालक, महाराष्ट्र राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे.

१६) संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ ( बालभारती), पुणे.

१९) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.

२०) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक.

२१) सर्व शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक/प्रौढ), जिल्हा परिषद.

२२) सर्व मुख्याधिकारी, नगरपालिका/ नगर परिषद.

२३) सर्व प्रशासन अधिकारी, नगर परिषद/ कटक मंडळे,

२४) शिक्षण निरीक्षक (पश्चिम/दक्षिण/उत्तर), बृहन्मंबई.

२५) निवड नस्ती (टिएनटी-१ कार्यासन)